**मार्गाचा / रस्त्याचा अधिकार अधिनियम (Right of Way Act) याचे प्रारूप तयार करण्यासाठी शिफारस करणेसाठी अभ्यास समिती गठीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-०४/२०१५/प्र.क्र.४७/अ-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई.
दिनांक :- ५ ऑगस्ट, २०१५.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने "पेट्रोलियम आणि मिनरल्स पाईपलाईन्स (Acquisition of Right of User In land) कायदा, १९६२ तयार केलेला असून सदर कायद्याच्या धर्तीवर इतर राज्यांनी उदा. बिहार, हरियाणा, मध्यप्रदेश इ. यांनी राज्यासाठी स्वतंत्र कायदा तयार केलेला आहे.परंतु, महाराष्ट्र राज्याने अशा प्रकारचा कायदा अद्यापपर्यंत तयार केलेला नाही.त्यामुळे पाण्याची पाईपलाईन टाकणे, विद्युतवाहिन्या टाकणे, गटारे इ. सोईसुविधा खाजगी जमिनीत निर्माण करावयाचे अधिकार राज्य शासनास प्राप्त होण्यास अडचणी येत आहेत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अशा प्रकारचा कायदा महाराष्ट्र राज्यानेही तयार करणे आवश्यक असल्यामुळे व सदर तयार करण्यात येणा-या कायद्यामध्ये ट्रान्समिशन लाईन, भूमिगत रस्ते, भूमिगत मेट्रो रेल्वे व भूमिगत गटारे तसेच पाण्याच्या पाईपलाईन टाकणे अशा सर्व बाबींचा समावेश होणे आवश्यक असून त्यानुषंगाने सर्वकष कायद्याचे प्रारूप तयार करण्यासाठी प्रधान सचिव (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली संबंधित विभागाच्या सचिवांची समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यावर सांगोपांग विचार करुन शासनाने खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र राज्यात खाजगी जमिनीतून विविध सार्वजनिक प्रयोजनार्थ मार्गाचा / रस्त्याचा अधिकार मिळविणे सुकर व्हावे यासाठी करावयाच्या कायद्याचे प्रारूप तयार करण्यासाठी प्रधान सचिव (महसूल) यांचे अध्यक्षतेखाली संबंधित विभागाच्या सचिवांची समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| प्रधान सचिव (महसूल) | - | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (नवि-१) | - | सदस्य |
| प्रधान सचिव (उर्जा) | - | सदस्य |
| सचिव (वने) | - | सदस्य |
| सचिव (म. व पु.) | - | सदस्य |
| उप सचिव (भूसंपादन) | - | सदस्य सचिव |

**सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-**

१) सदर समितीने यासंदर्भात कायदेशीर तरतूद करण्याकामी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ यामध्ये सुधारणा करावी किंवा राज्याने Right of Way Act असा नवीन कायदा करावा याबाबत प्रथम विचार करून शिफारस करावी.

२) Right of Way Act असा नवीन कायदा तयार करणेबाबत शिफारस झाल्यास, समितीने सदर सर्वकष कायद्याचे प्रारुप तदनंतरच्या १ महिन्याच्या कालावधीत तयार करण्याची कार्यवाही करावी. त्यासाठी आवश्यक तर इतर राज्यातील कायद्यातील तरतुदींचा विचार करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१५०८०५१२०१२२०११९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SUBHASH KISANRAO GAWADE

Digitally signed by SUBHASH KISANRAO GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SUBHASH KISANRAO GAWADE
Date: 2015.08.05 12:04:02 +05'30'

**( सु.कि.गावडे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.

२) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

३) प्रधान सचिव (महसूल) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

५) प्रधान सचिव (उर्जा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

६) सचिव (वने) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

७) सचिव (म. व पु.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

८) निवडनस्ती (अ-२)